**प्रशासकीय मान्यता**
**खरीप व रब्बी हंगाम सन २०२२-२०२३ करीता युरिया व डीएपी खताचा संरक्षित साठा (Buffer Stock) करुन ठेवणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : युसंसा १६२१/प्र.क्र. २०१/१७-अे (भाग-२)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३०/०३/२०२२.

**वाचा:-**

१. कृषि विभागाचा शासन निर्णय क्र. राखते २०१२/ प्र.क्र. ३५३/१७-अे, दि. १५/०२/२०१३
२. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/ खते/ गुनि ३-४/ बफर /२२-२३/ ३६७७४/२०२१, दि. ०९/११/२०२१.
३. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/ खते/ गुनि ३-४/ बफर /२२/ २४९९/२०२१, दि. २४/०१/२०२२.

**प्रस्तावना:**

राज्यामध्ये खरीप हंगामात जून, जुलै व ऑगस्ट या कालावधीमध्ये शेतकऱ्यांकडून खताची मागणी, खरेदी व प्रत्यक्ष वापर मोठया प्रमाणावर होत असतो. या कालावधीमध्ये निरनिराळया कारणामुळे म्हणजेच, मुळातच आवंटन कमी असणे, पाऊस किंवा अतिवृष्टीमुळे रेल्वे वाहतुकीमध्ये अडथळा येणे, रेल्वे रेक वेळेवर उपलब्ध न होणे, खत उत्पादन कारखाने कार्यान्वित नसणे इत्यादीमुळे खताच्या मागणीप्रमाणे पुरवठा करण्यावर विपरीत परिणाम होतो. खरीप हंगाम जून महिन्यापासून सुरु होत आहे. खरीप हंगामातील पेरणीच्या वेळी व उभ्या पिकांना खताचा दुसरा हप्ता देणे यामुळे युरिया व डिएपी खतांच्या मागणीमध्ये वाढ होत असते. शेतकऱ्यांच्या मागणीप्रमाणे खताची उपलब्धता होण्यासाठी खरीप हंगाम २०२२ करीता युरिया व डिएपी खताचा व रब्बी हंगाम २०२२-२३ करीता युरीया खताचा संरक्षित साठा करुन ठेवणे आवश्यक आहे. माहे एप्रिल २०२२ पासून युरीया व डिएपी खतांचा साठा करण्यास सुरुवात केल्यास, त्याचा उपयोग जून महिन्यानंतर होणार आहे. सदर बाब विचारात घेऊन कृषि विभागाच्या संदर्भीय क्र. १ येथील शासन निर्णयानुसार नियुक्त करण्यात आलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीच्या दिनांक १५ फेब्रुवारी २०२२ रोजी झालेल्या बैठकीमध्ये राज्यात खरीप २०२२ मध्ये १.०० लाख मे.टन युरिया खत व ०.५० लाख मे.टन डिएपी खताचा संरक्षित साठा करण्याबाबत, तसेच, रब्बी २०२२-२३ मध्ये ०.५० लाख मे. टन इतका युरिया खताचा संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर मान्यतेच्या अनुषंगाने राज्यामध्ये

युरिया व डिएपी खताची पुरेशी उपलब्धता होण्यासाठी संरक्षित साठा करुन ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

खरीप हंगाम २०२२ मध्ये राज्यातील शेतकऱ्यांना मागणीप्रमाणे व वेळेवर युरिया व डिएपी खतांचा पुरवठा करण्यासाठी १.०० लाख मे.टन युरिया खत व ०.५० लाख मे.टन डिएपी खताचा संरक्षित साठा करण्याबाबत, तसेच, रब्बी २०२२-२३ मध्ये ०.५० लाख मे. टन युरिया खताचा संरक्षित साठा (Buffer Stock) करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रयोजनार्थ १) महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई, २) दि.विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड नागपूर आणि ३) दि महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड मुंबई या तीन संस्थांना शासनाचे "नोडल एजन्सी" म्हणून नियुक्ती करण्यास तसेच महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळास ७० टक्के व इतर दोन संस्थांना प्रत्येकी १५ टक्के या प्रमाणे संरक्षित साठा करण्यास शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. वरीलप्रमाणे युरिया व डिएपी खताचा संरक्षित साठा करण्यास येणारा खर्च खालीलप्रमाणे राहील :-

**अ) खरीप हंगाम २०२२ ( एप्रिल २०२२ ते ऑगस्ट २०२२)- युरिया संरक्षित साठा १.०० लाख मे.टन-**

**(युरीया प्रती टन दर ५५००/-)**

| अ. क्र. | खर्चाचा प्रकार | खर्चाचा तपशील | | |
|---|---|---|---|---|
| | | खरीप २०२२ करीता प्रस्तावित दर (प्र.मे.टन | एकूण प्रस्तावित खर्च (प्र.मे.टन) | अधिक वस्तु व सेवा कर |
| १. | उतराई | ७० | ७० | १८% |
| २. | भराई | ७० | ७० | १८% |
| ३. | गोदाम भाडे ( ५ महिन्या करीता) | ७५ | ३७५ | १८% |
| ४. | दुय्यम वाहतुक | ४०० | ४०० | ५% |
| ५. | कर्जावरील बँकेचे व्याज ५ महिन्या करीता | ९% | २०६ | NIL |
| ६. | सेवाशुल्क | २% | १११ | १८% |
| ७. | विमा खर्च | ०.५% | ६ | NIL |
| | **एकूण** | | **१२३८** | |

**ब) रब्बी हंगाम २०२२ (सप्टेंबर २०२२ ते डिसेंबर २०२२)- युरिया संरक्षित साठा ०.५० लाख मे.टन (४ महिन्याकरीता):-**

**(युरीया प्रती टन दर ५५००/-)**

| अ. क्र. | खर्चाचा प्रकार | खर्चाचा तपशील | | |
|---|---|---|---|---|
| | | रब्बी २०२२- २३ करीता प्रस्तावित दर (प्र.मे.टन) | एकूण प्रस्तावित खर्च (प्र.मे.टन) | अधिक वस्तु व सेवा कर |
| १. | उतराई | ७० | ७० | १८% |
| २. | भराई | ७० | ७० | १८% |
| ३. | गोदाम भाडे ( ४ महिन्या करीता) | ७५ | ३०० | १८% |
| ४. | दुय्यम वाहतुक | ४०० | ४०० | ५% |
| ५. | कर्जावरील बँकेचे व्याज ४ महिन्या करीता | ९% | १६५ | NIL |
| ६. | सेवाशुल्क | २% | १११ | १८% |
| ७. | विमा खर्च | ०.५% | ६ | NIL |
| | **एकूण** | | **११२२** | |

**डिएपी (DAP) ०.५० लाख मे. टन साठा करण्यास येणारा खर्च :- (एप्रिल २०२२ ते ऑगस्ट २०२२)**

**(डी.ए.पी प्रती टन रु.२४०००/-)**

| अ. क्र. | खर्चाचा प्रकार | खर्चाचा तपशील | | |
|---|---|---|---|---|
| | | दर (प्र.मे.टन | एकूण प्रस्तावित खर्च (प्र.मे.टन) | अधिक वस्तु व सेवा कर |
| १. | उतराई | ७० | ७० | १८% |
| २. | भराई | ७० | ७० | १८% |
| ३. | गोदाम भाडे ( ५ महिन्या करीता) | ७५ | ३७५ | १८% |
| ४. | दुय्यम वाहतुक | ४०० | ४०० | ५% |
| ५. | कर्जावरील बँकेचे व्याज ५ महिन्या करीता | ९% | ९०० | NIL |
| ६. | सेवाशुल्क | २% | ४८० | १८% |
| ७. | विमा खर्च | ०.५% | ६ | NIL |
| | **एकूण** | | **२३०१** | |

२. **प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-**

(१) उपरोक्त तिन्ही संस्थांनी वरीलप्रमाणे संरक्षित साठा करण्यासाठी युरिया व डिएपी खताची किंमत आगाऊ भरावी.

(२) या प्रयोजनासाठी उपरोक्त नमूद केलेला खर्च हा अंदाजित असल्याने उपरोक्त प्रमाणे प्रस्तावित केलेला खर्च किंवा प्रत्यक्षात झालेला खर्च यापैकी जी कमी असेल ती रक्कम अदा करण्यात येईल.

(३) व्याजाची गणना करताना युरीयाचा दर रु.५५०० प्र.मे.टन व डिएपी चा दर रु.२४००० प्र.मे.टन इतका धरलेला आहे. संरक्षित साठा करताना दरात बदल झाल्यास ज्या दराने साठा खरेदी होईल त्या दराप्रमाणे व्याजाची गणना करण्यात यावी.

(४) गोदाम भाडे व व्याजाची गणना खरीप/रब्बी हंगामासाठी ५/४ महिन्यांसाठी केलेली आहे. तथापि प्रत्यक्ष साठा ज्या कालावधी करता केला जाईल त्या कालावधीसाठी गोदाम भाडे व व्याज देय राहील.

(५) जिल्हा निहाय व नोडल एजन्सी निहाय युरीया व डी.ए.पी. खतांच्या संरक्षित साठ्यांचे नियोजन आयुक्त (कृषि) यांनी त्यांच्या स्तरावर करावे.

(६) सर्व गावांमध्ये युरीया / डिएपी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने संरक्षित साठयाच्या गोदामांच्या संख्येत वाढ करण्यात यावी. प्रत्येक मंडळ मुख्यालय तसेच बाजारांच्या मोठया गावांमध्ये संरक्षित साठा गोदाम उपलब्ध करावे,जेणेकरुन विकेंद्रीत स्वरुपात संरक्षित साठा ठेवला जाईल.

(७) संरक्षित साठा करण्यासाठी निवडलेल्या गोदामांची यादी उपरोक्त तिन्ही संस्थांनी संबंधित कृषि विकास अधिकारी/ जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांच्याकडे द्यावी. सदर यादीस संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/ कृषि विकास अधिकारी यांनी ७ दिवसात मान्यता दयावी. ७ दिवसात मान्यता न दिल्यास यादीस मान्यता आहे असे गृहीत धरुन संरक्षित साठा करण्याची कार्यवाही संबंधित संस्थांनी करावी.

(८) संरक्षित साठा करण्याची जबाबदारी ही प्रत्येक जिल्हयाचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/ कृषि विकास अधिकारी यांची राहील. खत कंपन्याकडून जिल्हयात येणाऱ्या खतांमधून संरक्षित साठयासाठी युरीया/ डिएपी उपलब्ध करुन दिला जाईल याची दक्षता संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/ कृषि विकास अधिकारी यांनी घ्यावी.

(९) जिल्हयांना आवंटीत केलेला संरक्षित साठा मे २०२२ पूर्वी तयार न झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी/ कृषि विकास अधिकारी यांची राहील.

(१०) संरक्षित साठयाचे वितरण झाल्यानंतर प्रत्येक महिन्याची देयके नोडल एजन्सीद्वारे पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत कृषि विभागाकडे सादर करावीत. जिल्हा अधिक्षक कृषि

अधिकारी यांचेकडून देयकांची छाननी करुन महिन्याच्या १५ तारखेपर्यंत कृषि आयुक्तालयास सादर करावीत.

(११) सदर बाबीकरीता होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

मागणी क्रमांक : डी-३
१०५, खते व रासायनिक खते,
(००) (००) (३१) डीएपी व मिश्र रासायनिक खतांचा पुरवठा
करण्यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता अर्थसहाय्य (कार्यक्रम)
३३, अर्थसहाय्य ( २४०१ ८२०८)

(१२) संरक्षित साठा करण्यासाठी येणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती करताना प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक यामधील तरतुदीनूसार अंमलबजावणी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०१३२६०६१६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAKASH RAWOO KADAM

Digitally signed by PRAKASH RAWOO KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6,
pseudonym=22C98915B0D57E8A4AE6BA33EC226C3725655E71,
serialNumber=71172C5D9D385E975252C0585193200575D0F23122741AD16703141150CC4876, cn=PRAKASH RAWOO KADAM
Date: 2022.03.30 13:27:13 +05'30'

**( प्रकाश रा. कदम )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई
६. दि.विदर्भ को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, नागपूर.
७. दि.महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लिमिटेड, मुंबई.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
९. कृषि संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
११. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१२. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी / कृषि विकास अधिकारी.

१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. वित्त विभाग (व्यय-१ व २, अर्थसंकल्प -१३ ), मंत्रालय, मुंबई
१५. उप संचालक (खते), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
१८. कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. १७-अे कार्यासन, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती).